अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन अधिकारी/सांख्यिकी अधिकारी,गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील अधिका-यांचा <u>परिवीक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत</u>

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग**

**शासन आदेश क्रमांक - ईएसटी १०१७/प्र.क्र.२९/का.१४२७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- १० एप्रिल, २०१७

<u>वाचा</u> :- १) नियोजन विभाग, शासन आदेश क्र.आरटीएन १६१२/प्र.क्र.१२५/का.१४२७, दिनांक ०७.१०.२०१३

२) अर्थ व सांख्यिकी संचालनालयाचे पत्र क्र.परिवी-२०१५/गट-ब (राज)/प्र.क्र.२८/प्रशा-२/ ३०८, दिनांक २२.०२.२०१७

**<u>कार्यालयीन आदेश</u> :**

अर्थ व सांख्यिकी संचालनालयात "संशोधन अधिकारी/सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित)" पदावर एकूण चार अधिका-यांची संदर्भाधीन दिनांक ७.१०.२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यात आली आहे. संबंधित अधिकाऱ्यांची पदस्थापना ते अधिकारी रुजू होतील त्या दिनांकापासून दोन वर्षांच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी असेल, असे सदरहु नियुक्ती आदेशात नमूद करण्यात आले आहे.

२. दिनांक ७.१०.२०१३ रोजीच्या नियुक्ती आदेशात नमूद केल्याप्रमाणे, दोन वर्षांच्या कालावधीत विहित विभागीय परीक्षा (जर काही असल्यास) आणि संगणक हाताळणी परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक होते. तसेच हिंदी व मराठी भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे किंवा त्यातून सूट मिळणे आवश्यक होते. त्याप्रमाणे खालील नमूद अधिकाऱ्यांना सदर परिक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात आली आहे. शासन परिपत्रक क्र.५३४६/४६, दि.२६ ऑगस्ट, १९५२ नुसार सदरहु दोन वर्षांच्या परिवीक्षाधीन कालावधीत परिवीक्षा अधिका-यांनी जर रजा उपभोगलेली असेल, तर त्या रजेच्या कालावधीएवढा परिवीक्षा कालावधी वाढविणे आवश्यक आहे.

३. उपरोक्त आदेशान्वये "संशोधन अधिकारी/सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित)" संवर्गात नियुक्त करण्यात आलेल्या अधिका-यांच्या संदर्भात, विहित अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याने तसेच सदर अधिकाऱ्यांनी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला असल्याने त्यांनी उपभोगलेल्या रजा विचारात घेऊन परिवीक्षाधीन अधिका-यांचा पुढील विवरणपत्रात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या दिनांकास परिवीक्षा कालावधी संपुष्टात आणण्यात येत आहे व सदर पदावर त्यांची नियमित /स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | परिवीक्षाधीन अधिका-याचे नांव | नियुक्ती दिनांक | परिवीक्षा कालावधी संपुष्टात आल्याचा दिनांक |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्रीमती नि. चं. जोशी | १९.१०.२०१३ | ०४.११.२०१५ |
| २ | श्री. सं.कृ.शिंदे | १५.१०.२०१३ | १३.११.२०१५ |
| ३ | श्रीमती म.र.माने | ०१.११.२०१३ | १२.१२.२०१५ |
| ४ | श्री. वि.प्र.देशमुख | १५.१०.२०१३ | २६.११.२०१५ |

४. सदर शासन आदेश सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही-१०९४/ १८३७/प्र.क्र.१८/९५/आठ, दि.२८ मार्च, १९९५ नुसार सूचना लक्षात घेऊन तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.परिवि २७१५/प्र.क्र.२०३/आठ, दि.२५ ऑगस्ट, २०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून; त्याचा संकेतांक २०१७०४१०१५४८१६०११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vanita Narayan Jadhav

Digitally signed by Vanita Narayan Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f0e1884948542877a779b797fc357f1c34d84fe1aa3f9bdc30c060e0431223f, cn=Vanita Narayan Jadhav
Date: 2017.04.10 17:00:27 +05'30'

**( वनिता जाधव )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२) सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, कोकण विभाग, नवी मुंबई/नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद.
३) उपसंचालक (प्रशा.), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
४) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, नवी मुंबई/नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद.
५) संबंधित अधिकारी (अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत).
६) निवड नस्ती.